# विपश्यना ध्यान शिबिर धम्मालय, कोल्हापुर.

## भाग 1

प्रेषक, शशिकांत ओक, Thu, 20/03/2014 - 00:51



कोल्हापुरच्या धम्मालयाचा पॅगोडा

विपश्यना ध्यान शिबिर

"या धम्मालयाचे आकर्षण होते, सोनेरी कळसाचा पॅगोडा!पॅगोडा म्हणजे काय? त्याच्या आत काय असते? तेथे जायला आम्हाला परवानगी मिळणार का? असा

**सुरवातीला पडलेला पेच नंतर सुटला, कारण प्रत्येकाने तेथे जाऊन ध्यान करायला सांगितले गेले”...**

गोएन्काजींचे नाव, त्यांच्या मधुर वाणीतील विपश्यनेचे काही विचार दूरदर्शनच्या मुलाखतीतून खूप वर्षांपासून ठाऊक होते. हळु हळू विविध कारणांनी ध्यानधारणा करायसाठी प्रयत्न सुरू झाले. पण बूड १० मिनिटांपेक्षा स्थिर राहिना. नाडीग्रंथातून म्हटले गेलेले कथन की ‘जीवनात अशी एक वेळ येईल की त्यामुळे आवश्यक साधना न घडण्याने मनाला अस्वस्थता येईल. नाडीग्रंथांच्या संबंधीचे लेखन, चिंतन, वार्ता अनेकदा अशा लोकांच्या समोर जाईल की त्यामुळे नाहक बोल ऐकायला लागतील. त्यासाठी लक्षात ठेवावे की काही लोकांच्या जन्मजात स्वभावातच तो गुण असल्याने जे कर्म तुला प्रेमभाव, आदर, श्रद्धा भाव जागृत करते ते नेमके काहींना निंदा, तिरस्कार वा द्वेष करायला प्रवृत्त करते. तो मनुष्य स्वभाव आहे. प्रमुदितता व कृतज्ञता भाव असेल तर अशा लोकांत सद्भावना जागृत होईल. तेंव्हा मन शांत ठेवावे. अपराधी भावना करायची गरज नाही.’

अशा मनोधारणेत असताना एक दिवस चिरंजीवांनी मला खडसावले, ‘बाबा, बास झाले, लेखन-बिखन. आता साधना केलीत तरच काही अपेक्षित होण्याची शक्यता आहे, नाहीतर पात्रता असूनही संधी गमावल्याची हळहळ राहील. तेंव्हा विपश्यना केंद्रात जायची तयारी करा. शुभ कार्य शीघ्र’.

‘आत्ताच्या आत्ता’ असे पुटपुटत कपडे चढवले व पुण्याच्या विपश्यना केंद्रात दाखल झालो. माहिती घेतली व नेटवरून बुकिंग करून कोल्हापुरजवळच्या धम्मालय केंद्रात २०जूनला दाखल झालो. हातकणंगले रेल्वे स्टेशनवर आणखी तीन जण भेटले व रिक्षा करून आम्ही ५ किमी लांब वेडीवाकडी वळणे घेत धम्मालयच्या गेटपाशी आलो. एकांनी आपण जरा आधी पोहोचला आहात. लोक दुपारपासून यायला लागतील, तोवर आराम करा म्हणून एक-दोन खोलीनंबर सांगून थांबायची सोय केली. दुपारचे जेवण झाले व जरा डुलकी लागली, तोवर गलका वाढला म्हणून पुन्हा गेटवर आलो. पाहतो तो तोबा गर्दी...!

साधारण ५० - ६० जण पुरुष व ३५ -४० बायका, विविध वाहनांनी येत होते. रिक्षांची लगबग विशेष होती. अनेक गाड्यातून जीन्स कुडत्यातील तरुण मंडळी उतरत होती तर रिक्षाने पांढरा सदरा, विजार व डोक्याला गांधी-टोपीवाले गावाकडचे लोक पण हजर होत होते. एक फॉरेनर पुरुष चकोट करून आला होता तर एक विदेशी बाई अजागळ कपड्यात वावरताना दिसत होती. होता होता आपापले रूम क्रमांक,

पांघरायला रग, अंथरायला चादर व उशीचा अभ्रा असे काखोटीला मारून, मोबाईल, पैसे व अन्य किमती वस्तू जमाकरून आपापल्या रुमकडे जात होते. रात्री ८ नंतर मौनाला प्रारंभ होईल असे सांगण्यात आले. दुसऱ्या दिवशीच्या सूचना मिळाल्या व ती रात्र सरली. पहाटे मोठया परातीवर ठोका पडून होतो तसा आवाज झाला. चार वाजल्याने डोळे किलकिले करून उठायची सुरवात झाली. आता हातात मोबाईल वा घड्याळ नसल्याने वेळ सूचक ठणठणाटाची सवय होणार होती. तोवर आरतीतील घंटी घेऊन इमारतीच्या रस्त्यांवरून, ‘उठा उठा हो सकळिक’ असा किणकिणाट सूचित करत होता. 4:30 झाले व आम्ही धम्मालयातील ध्यानकक्षात प्रवेशलो.



साधारण २०० लोक आरामात दाटीवाटीने न करता बसतील असा मोठा प्रशस्त हॉल होता. समोरच्या आसनावर उपधर्माचार्य पांढऱ्याशुभ्र वेषात आसनस्थ झाले. त्यांच्या उजव्या हाताला टेप रेकॉर्डर, लॅपटॉप, रिमोट अन् प्रकाश योजना कमी जास्त करायची बटण लीलया हाती येतील अशा तऱ्हेने ठेवलेली होती. त्यांच्या मागे आणखी एक आसन तयार होते. त्याच बरोबर एक फोल्डिंग स्क्रीन पुज्य कै. गोएन्काजींच्या प्रवचनाच्या व्हीडिओ टेप दाखवायसाठी सज्ज होता. स्त्रिया व पुरुषांच्या बैठकांमधे एक हिरव्या रंगाचे कार्पेट होते. प्रत्येकाला २’बाय २’चे गादीवजा बस्कूर, त्यावर एक

उशी त्याला एका निळ्या चादरीचे आच्छादन, अशी आसने प्रत्येकाच्या नावासह तयार होती, खोकले, खाकरे, जांभया, चुटक्या वा आळस दर्शक बोटांचे कडा-कडा आवाज निषिद्ध होते. मौनाशिवाय हालचाली हळुवार व इतरांच्या साधनेत खंड पडू न देण्याच्या दक्षतेची वागणूक अपेक्षित होती.

सुरवातीला नाकातून आत व बाहेर जाणाऱ्या श्वासावर लक्ष द्यायची कला अवगत करायसाठी प्रयत्न करायला सुचना झाली. काहींनी श्वास आला – गेला असा ताल धरला तर काहींनी मनात आवडता जप करायच्या नादावर आपला श्वास नियमित करायला सुरवात केली. पण ते या साधनापथात अपेक्षित नाही. श्वासाचे फक्त आवागमन होत आहे याचा अनुभव घ्यायला अपेक्षित आहे असे सांगितल्यावर आपली साधना फुकट गेली की काय असा भाव मनात आला. त्यावर सांगण्यात आले, असे अनेकदा होईल कारण मनाला अजून वळण नाही. प्रयत्नशील रहा.

असे करता करता सकाळचे साडेसहा झाल्याचे सूचक टोले झाले. उपधर्माचार्यांनी आता नाश्ता करा. नंतर आठला हजर व्हावे अशी सूचना केली. आम्ही जवळ असलेल्या जेवणखाणाच्या हॉलकडे निघालो. तिकडे स्त्रियांसाठी वेगळी सोय होती. प्रत्येकाने आपापली ताट-वाटी-पेला-चमचा आपापल्या क्रमांकाच्या जाळीदार खाने असलेल्या स्टँड मधून काढून रांग लाऊन, आपापले वाढून घेऊन डायनिंग टेबलावर जाऊन, प्लास्टिक खुर्चीत बसून आरामात नाश्त्याचा आस्वाद घ्यायचा होता. सुरवातीला जरा जास्त वाढून घ्यायला वाटे. नंतर नंतर वाटले तर धम्मसेवक आपल्याला हवा तो पदार्थ वाढतील असा शिरस्ता होता. दूध वा चहा असा पर्याय होता. काहींना दोन्हीचा आस्वाद घ्यावासा वाटल्याने दोन वाट्यातून दोन्ही द्रव पदार्थाची त्यांनी चव घेतली! फिरता मेनू होता. कधी उप्पिट वजा सांजा तर कधी विवाहासाठी स्थळ पहायला करतात ते पोहे, कधी गव्हाचे पॉरिज तर कधी इडली-सांभार चटणी, कधी ढोकळा-इमली चटणी असा विविध व चवदार फराळ होता.

आठ ते अकरापर्यंत मांडी घालून ध्यानाला बसायला लागे. रग लागली, कळा यायला लागल्या तर तो ध्यानातील प्रगतीचा भाग असल्याने, शरीराला काय कटकट असा त्रागा करायला जागा नव्हती. शरीराने असे अंगावरील संवेदनांचे जाणणे अनुभवायला तर आलोय असे मनात म्हणून खमाटून बसणे गरजेचे होते. काहींना सवय नव्हती त्यांनी खुर्चीवजा आसनाचा पर्याय निवडला तर कांहींनी पाठीला भिंतीचा आधार शोधला. असो.

पुढे चालू ...भाग 2

# विपश्यना ध्यान शिबिर धम्मालय, कोल्हापूर.

## भाग २

## सुंदर कपड्यातील ललना आपण फक्त द्रष्टाभावाने पहायच्या

**प्रेषक, शशिकांत ओक, Thu, 20/03/2014 - 12:34**

**भाग २ ...**

**...पुर्वीच्या लोकांना टिवल्याबावल्या करत बसायला वेळ पण होता. बिनविजेच्या मिणमिणत्या अंधाऱ्या रात्रीत, जंगलातील श्वापदांच्या भयंकर संगतीत, पाण्यासाठी वणवण भटकत फिरणाऱ्या, आक्रमणांच्या लढायांना तोंड देत देत जीवन रहाटणी करणाऱ्या जुन्या काळी, त्या लोकांना त्यांच्या दुःखी जीवनाची रहाटणी ध्यानाला प्रेरक असावी. आता फारसा कोणी या वाटेला जायला धजणार नाही व बुद्ध बनायला जाता जाता बुद्धु बनायला तयार होणार नाही. ...**
**...सध्याच्या या धावत्या जगात कोणाला आहे इतका वेळ द्यायला व कोणाला हवी आहे मानसिक, अध्यात्मिक प्रगती? आहे ते ठीक आहे. खावे, प्यावे, मजा करावी....**
**...सुंदर सुंदर कपड्यातील ललना आपण फक्त द्रष्टाभावाने पहायच्या, नाही आवडले दृष्य तर रिमोटच्या क्लिकवर त्यांना ढकलून, नव्या दृष्याला तितक्याच निरिच्छपणे पाहायचा सराव आता झाला आहे. इतके मेले, इतके जखमी आता आपल्याला मनात फार वेळ विषादाच्या संवेदना निर्माण करत नाहीत, ना सुंदरींच्या अश्लील चाळ्यांमुळे अगदी तरुण पहाणाऱ्यांच्या भावना तडकत नाहीत. ...**





अकराच्या ठोक्याला जेवणासाठी जायची सुचना झाली व पुन्हा आमची पावले जेवणघराकडे लागली. दोन पोळ्या, हवा तितका भात, पातळ आमटी वजा डाल व भाजीचे तोंडी लावणे, दही वाटी वा कोशिंबिर असा साधा पण भरपेट खाना होता. प्रत्येकाने रांगेने सुबकपणे ठेवलेली फळे व पदार्थ वाढून घेऊन जेवणानंतर भांडी विमसोपने धुवुन पुन्हा आपापल्या जागी ठेवल्यावर फिल्टरचे पाणी पिण्यापाशी गर्दी होई.

नंतरचा वेळ रात्रीची उरलेली झोप भरून काढण्यात जाई, पुन्हा एक ते तीन ध्यान साधनेत जाई. नंतर सायंकाळी ५ला घंटा झाली की सांगलीफेम चुरमुऱ्याच्या

भडंगाच्या फक्क्या रोज मारत, चहा व एक फळ असा रात्रीच्या जेवणाचा भरगच्च मेनू असे. सायंकाळी पाचपर्यंतच्या वेळेत उपधर्माचार्य आळीपाळीने साधकांना बोलावून विचारपुस करत, तेंव्हा तोंड उघडायची संधी मिळे. 'गोएन्काजी जे हिन्दीतून सांगतात ते समजते का? या विचारणेला, 'हो समजते, पण काही वेळी कठीण जाते'. प्रगती ठीक वाटतेय का? याला 'जमतय तितके करतोय' असा उत्तराचा सारांश असे.
या धम्मालयाचे आकर्षण होते, सोनेरी कळसाचा पॅगोडा! पॅगोडा म्हणजे काय? त्याच्या आत काय असते? तेथे जायला आम्हाला परवानगी मिळणार का? असा सुरवातीला पडलेला पेच नंतर सुटला, कारण प्रत्येकाने तेथे जाऊन ध्यान करायला सांगितले गेले. पॅगोडा म्हणजे ध्यानाच्या साधारण ४`बाय ६` अशा छोट्या खोल्या असलेली दु किंवा तिमजली गोलाकार वास्तू ! मध्यात मुख्याचार्य बसून त्यांच्या भोवती आठ प्रमुख साधकांच्या शिष्यांनी व त्या खालील स्तरावरील त्यानंतरच्या गोलाकारातखोल्यात अन्य सदस्यांनी ध्यानाला बसावे अशी त्याची रचना आहे. साधनेच्या वर्गवारीतील उच्च पातळीवरील साधकांच्या शरीरातून शक्तीलहरी अन्य साधकांच्या ध्यानाला, पाण्याच्या कारंज्याप्रमाणे वर्षाव करत पुरक व्हाव्यात असे त्या मागील कारण असावे असा वाटले. ध्यान करताना त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला. जे आधीच्या दोन दिवसात साधताना कष्ट पडले, ते तेथील अंधारात काही मिनिटात साधले!
बाहेर ढगाळ वातावरण, पॅगोडाच्या मागे डोंगरांच्या उतरणीवर हिरव्या गर्द झाडांच्यामधे लालचुटुक गुलमोहोर अन शंकासुराच्या फुलांचा डंवर रंगसंगती साधून होता. मोरांचे थवेच्या थवे आपले अस्तित्व कर्कश्य ओरडून तर विविध पक्षी आपल्या मंजुळ आवाजाने करू देत असत. मधेच पावसाच्या सरींनी आम्हाला छत्र्या उघडायला लावले. एकदा आकाशात दुहेरी इंद्रधनुष्याची नयनरम्य शोभा पहायला मिळाली. आम्हाला आनंदाच्या लहरीं निर्माण करायला निसर्गचिताऱ्याची लहर काही काळ दोन इंद्रधनुष्यातून सरसावली. ध्यानात समता भाव हवा असे ठासून सांगितले जात होते. निसर्गाने केलेली सप्त रंगाची उधळण समताभावाला मागे सारून आमच्या शरीरावर रोमांच निर्माण करणारी असेल, तर भगवान बुद्धांनी अशा मनोहरी दृष्यांचा आस्वाद द्रष्टाभावाने कसा घेतला असेल असा विचार विजेप्रमाणे चमकून गेला. असो.
मनांत येत असे कि सध्याच्या या धावत्या जगात कोणाला आहे इतका वेळ द्यायला व कोणाला हवी आहे मानसिक, अध्यात्मिक प्रगती? आहे ते ठीक आहे. खावे, प्यावे, मजा करावी. भोक्ताभाव आता राहिलाय तरी कुठे? आपण सर्व टीव्ही, सिनेमा,

वर्तमानपत्र द्रष्टाभावाने तर पहातो. पडद्यावरची पात्रे मजा करताना, मारधाड करताना दृश्यात दिसतात, अगदी लहान पोरांना देखील माहिती असते कि पडद्यावर दिसते तसे नसते. सिनेमातील लोक मरत नाहीत कारण तेच पुन्हा दुसऱ्या सिनेमात हाणामारीला पुन्हा नव्या जोमाने, नव्या क्लुप्त्या करत निर्ढावलेले दिसतात. सुंदर सुंदर कपड्यातील ललना आपण फक्त द्रष्टाभावाने पहायच्या, नाही आवडले दृष्य तर रिमोटच्या क्लिकवर त्यांना ढकलून, नव्या दृष्याला तितक्याच निरिच्छपणे पाहायचा सराव आता झाला आहे. इतके मेले, इतके जखमी आता आपल्याला मनात फार वेळ विषादाच्या संवेदना निर्माण करत नाहीत, ना सुंदरींच्या अश्लील चाळ्यांमुळे अगदी तरुण पहाणाऱ्यांच्या भावना तडकत नाहीत. जाऊ दे. आपल्याला काय करायचे ते करावे ना.
पुर्वीच्या लोकांना टिवल्याबावल्या करत बसायला वेळ पण होता. बिनविजेच्या मिणमिणत्या अंधाऱ्या रात्रीत, जंगलातील श्वापदांच्या भयंकर संगतीत, पाण्यासाठी वणवण भटकत फिरणाऱ्या, आक्रमणांच्या लढायांना तोंड देत देत जीवन रहाटणी करणाऱ्या जुन्याकाळी, त्या लोकांना त्यांच्या दुःखी जीवनाची रहाटणी ध्यानाला प्रेरक असावी. आता फारसा कोणी या वाटेला जायला धजणार नाही व बुद्ध बनायला जाता जाता बुद्धु बनायला तयार होणार नाही.
रात्री गोएन्काजींचे त्या त्यादिवशीच्या ध्यानातील बारकाव्यांवरील रसाळ प्रवचन नवनवीन विचारांना सामोरे जायला भाग पाडत असे. एकदा विपश्यना ध्यानाचा भारतात व विदेशात प्रसार कुठे कुठे व कसा चालू आहे. याचा आढावा सांगणारी टेप वाजवली गेली. अन माझ्या नेहमीच्या विचारांना चांगलाच तडाखा बसला. दर वर्षी सध्या कमीत कमी एक लाख लोक विपश्यना ध्यानाच्या शिबिरात येऊन ध्यान व साधना पद्धती समजून घेतात. असे त्यात म्हटले गेले होते. ही साधना सुरवातील घरगुती प्रमाणात सुरू होऊन हळू हळू विस्तृत प्रमाणात वाढत वाढत, गेल्या ४० वर्षात पुज्य गोएन्काजींच्या शिबिरातून चालत आली आहे. असे ही त्यातून कळले. अगदी **८०:२०**चे सरसकट माप लावले तर दरवर्षी शिबिरात साधना केलेल्यांपैकी ऐंशी हजारांनी नंतर साधना करायचा कंटाळा केला, फार लक्ष नाही दिले तरी वीस हजार लोक ते करायचा नेटाने प्रयत्न करत असतील असे मानले, त्यापैकी **२०**टक्के म्हणजे ४००० जण पुन्हा पुन्हा शिबिरातून साधनेचा पाठपुरावा करणारे निघतील. पैकी वीस टक्के म्हणजे ८०० लोक विशेष प्रगतीपथावर असतील. त्यापैकी वीसटक्के म्हणजे १६० जण बुद्धत्वाला प्राप्त करायचेच अशी तीव्र जाणीव साधतील. व त्यातील बत्तीस जणांसाठी निर्वाण प्राप्त होण्याची गती जवळ आली असेल. ज्यांना ती प्राप्ती

होते ते दवंडी पिटत नाहीत असे मानले तर मौन राहून आत्ता इथे, पृथ्वीतलावर असे अनेक जीव-साधक सध्या जगभर विखुरलेले आहेत.
प्राचीन काळात जे इतक्या मोठ्याप्रमाणात साधले गेले नसेल ते या शिबिर केंद्रांतून साध्य होत असेल. आधुनिक तंत्रामुळे विपश्यना साधनेतील मार्गदर्शन खुद्द पुज्य गोएन्काजींच्या मुखातून होत असल्याने या ध्यानपद्धतीत काही फेरफार करून त्यात गढूळपणा येणे सध्यातरी अवघड आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे ही पद्धती अशीच्या अशी अविरत २ - ५ शेवर्षे टिकली तर त्याचे फळ जागतिक स्तरावर मानवी जीवनात प्रत्यक्ष दिसायला लागेल. असो.
**भाग २ समाप्त,** पुढे चालू...

# विपश्यना ध्यान शिबिर धम्मालय, कोल्हापूर.

# विपश्यना ध्यान शिबिरात भुताटकी ?

## भाग ३

## आयुष्यात एकदा तरी घ्यावा असा अनुभव

नुकतेच कोल्हापूरच्या विपश्यना केंद्रात शिबिर साधनेला जाणे झाले. त्या काळातील काही आठवणींवर आधारित लेख.
दहा दिवसांकरिता मौन व्रत. संतुलित मित आहार. पहाटे चार ते रात्री नऊपर्यंत ठरावीक आखीव कार्यक्रम. साधनेतून आपल्या विचारावर लक्ष साधून नंतर सर्व शरीरातून एक संवेदनेची लहर उत्पन्न करायचे तंत्र शिकणे, हा या शिबिराचा उद्देश होता. त्या वेळच्या घटनात मौनाने आणखी गुंतागुंत वाढली...
ती रात्र होती सहाव्या दिवसाची...
साधनेच्या कार्याला आता जारीने सुरुवात झाली होती. पूज्य गोएंकांच्या मधुर वाणीतून व साधनेतील खाचाखोचा सांगितल्या जात होत्या.
पाली वाणीतून ते अनेक श्लोक व अभंग सादर करत. आता पाली भाषेतील 'अनिच्छ' म्हणजेच 'अनित्य'. 'सव्व' म्हणजे 'सर्व', अशा शब्दांशी जवळीक साधली जात होती. 'क्षणोक्षणी घडून संपणारे हे जग अनित्य आहे. मग सुख व दुःखदेखील असेच अनित्य आहे, तर असा अनित्य जीवन प्रवास शरीराद्वारे होतो. त्यातून

निघणाऱ्या संवेदनाही अशाच अनित्य आहे, याची जाणीव क्षणोक्षणी होऊन काही केल्या झोप येत नव्हती...

...एरव्ही न सुचणाऱ्या अनेक विचारांचे काहूर माजले होते. पहाटे पहाटे जरा झापड आली असावी. इतक्यात... इतक्यात एकदम जोरात ओरडल्याचा आवाज झाला... काय असावे? असे क्षणभर वाटले. पण नंतर सामसूम होती. म्हणून मी जरा साशंकपणे काय झाले असेल की मलाच आभास झाला असावा, असा विचार करत असता, पुन्हा जोरात ओरडल्याचा आवाज झाला. आता खात्रीच झाली की आवाजाचा आभास नाहीत... नक्कीच कोणीतरी मदतीची हाक देत आहे. मी मच्छरदाणीतून बाहेर आलो. बॅटरी हातात घेऊन माझ्या खोलीचे दार उघडून बाहेर आलो. खरे तर माझ्याबरोबर खोलीत राहणाऱ्यालाही उठवावे काय, असे वाटले, पण मौनाचे बंधन होते. मग कशाला उठवा, असे मनात म्हणत मी शेजारच्या खोलीच्या पायऱ्या चढून दरवाज्याशी थांबलो. एकदा वाटले की जर कोणी साप किंवा असे काही कॉटखाली लपून जाताना पाहून ओरडले असेल तर त्याला मदत हवी. पण आवाज केला तर ते पळून जाईल म्हणून, आतला आवाज शांत असावा...

मौनाचा भंग न व्हावा, पण मी बाहेर मदतीला आहे असे सूचित करायला मी खाकरून दरवाज्यावर हळुवार टकटक केली व वाट पाहत राहिलो. तो एकदम अचानक आतून दरवाजा झटकन उघडला गेला... “कोण? ... कोण आहे?...” असे म्हणत, अर्ध्या चड्डीतील तेथील साधक एकदम बाहेर आला. बॅटरीच्या प्रकाशात पाहत मला म्हणाला, “छे!, छे! कुठे काय? सर्व ठीक आहे!”

तो जागा झाला आहे व घाबरलेला नाही असे पाहून त्याला खालच्या स्वरात मी म्हटले, “आपल्याला काही आवाज आला का? कारण मला या खोलीतून दोनदा ओरडल्याचा आवाज आला, म्हणून विचारायला आलोय.”

असे म्हणता, उलट आश्चर्य करत मला विचारले,

“किती वाजलेत?” त्याच्या एकंदरीत आवेशावरून कदाचित त्याला वाटले असावे की, मी काही कारणाने घाबरून गेल्यामुळे, धास्तावल्याने जरा तंद्रीत आहे. मला जरा ताळ्यावर आणायला त्याने विचारले असावे. “किती वाजले?”

चारला काही मिनिटे कमी आहेत असे मी म्हणता, ‘जागे आहेत बरं का' याची खात्री वाटून ते म्हणाले, “बरं! बरं!”

त्यांनी पटकन दार बंद करायच्या आधी मी त्यांच्या खोलीतील दुसऱ्या साथीदाराच्या कॉटकडे पाहत होतो. त्यावर ते म्हणाले, “ते काय झोपलेत ना”

“ठीक आहे” असे म्हणत मी पुन्हा रूमवर आलो व खोलीत येऊन जरा आडवा झालो तोवर...
टंण्ण... टंण्ण.... थाळावर पहाटे चारचे टोल वाजायला लागले व डोळ्यावरील झापड उतरवत साधकांची हालचाल सगळीकडे व्हायला लागली. 'किण किण... किण किण' .... बारीक आवाजाची घंटा त्या नीरव शांततेत आपले अस्तित्व दाखवून दुर्लक्ष करून पुन्हा जरा पांघरुणात घुसलेल्यांना सताड जागे करायला पुरेशी होती. तो आवाज व ती घटना मी नंतर विसरलो होतो. पण ते प्रकरण तसे थांबणारे नव्हते! शिवाय मलाही त्या प्रकरणाचा तलास लावायची उत्सुकता होतीच.

एकदम रागावलेल्या स्वरात कोणी बोलतेय की काय, असे परतायच्या अगदी एक दिवस आधी वाटायला लागले. आता तर दिवसा हा आवाज! तोही मलाच फक्त येतोय की काय? असे वाटून मी सावधपणे त्यावर लक्ष ठेवायला लागलो, तर तो आवाज वाढतच होता. एकाचे दोन आवाज झालेले... आता दोन आवाज येतायत. बापरे ... पण मग आधीचा पहिला आवाज जरा मऊ झालेला आहे, त्याला कारुण्याची झाक आहे, असे वाटायला लागले. बुद्धाच्या भूमीतील साधना शिवारातील भुतेपण कारुण्यभावनेने ओथंबलेली असतात की काय, असे वाटून मी आश्चर्य करीत होतो व पूज्य सत्यनारायण गोएंकाजींच्या प्रभावी वाणीने भुतांचा स्वरही कातर झाल्याचे वाटून मला भगवान गौतम बुद्धांबद्दल आदर दुणावला! आवाजाचे हे गूढ आता मला फार आव्हानात्मक झाले. काय आहे त्याचा सोक्षमोक्ष लावलाच पाहिजे, असे वाटून मी खोलीच्या बाहेर आलो. अन पाहतो तो काय! पांढऱ्या रंगाचा एक दांडगा रानबोका आपली शेपटी ताठ करून, त्यावरी सर्व केस फिस्कारून भलताच रोमँटिक मूडमध्ये होता! उदी रंगाच्या मैत्रिणीशी जवळीक करायच्या बेतात असावा! त्या वेळी मी नेमका पोहोचल्याने त्याने मला पाहून असा काही तीव्र आवाज काढला अन डोळे फाडून पाहत जणू काही म्हणाला, 'समझता नही क्या बे? चल भाग जा! असा रागीट सुरात सल्ला देऊन शेपटीचा पिसारा झाडून तिच्या कातर आवाजाला साद द्यायला लागला.
'हा हंत हंत! ... नाही नाही, चालू देत तुमचे! असे मी उगीचच पुटपुटत खोलीत वळलो व हसून त्या आवाजाच्या रहस्याचा असा पर्दाफाश झाला असे म्हणून हवाईदलातील विमाने शत्रुपक्षाच्या नरडीचा घोट घेऊन परतताना जे समाधान व्यक्त करतात, तसे उगीचच वाटले खरे....
तरीही हे प्रकरण तसे संपलेले नव्हते! कारण जो साधक ओरडला असे मला उगीचच

वाटत होते, त्याला सत्य परिस्थिती सांगणे महत्त्वाचे होते. दहावा दिवस झाला तेव्हा आम्हाला सांगण्यात आले की मौन व्रत आता फक्त शांती पठारावर व शून्यागारातील व धम्महॉल क्रमांक २मध्ये लागू राहील, अन्य ठिकाणी तुम्हाला सकाळी १०नंतर बोलायला परवानगी आहे. दहा वाजले अन सर्वांना कंठ फुटला. मीही घसा साफ करून घेतला. तेवढ्यात शेजारच्या खोलीतील ती व्यक्ती दिसली. पांढरा शर्ट व खाली लेंगा, दहा दिवसाची दाढी वाढलेली जरा गावठीपणाची झाक... त्यांना तो आवाज बोक्यांचा होता असे हसून म्हटल्यावर, “असं का? बरं, बरं” म्हणून थंडा प्रतिसाद दिला व ते गेले. त्यानंतर आपापले सामान, सेलफोन, पैसे, पर्सेस, गोळा करायची धांदल झाली. नंतर अचानक शेजारच्या खोलीतील त्या ग्रहस्थांच्या बरोबर राहणाऱ्या व्यक्तीची ओळख झाली.

ते म्हणाले, “मी आपल्याशी बोलायला आलोय.” त्यांनी केलेला खुलासा ऐकून मी थक्क झालो. नंतर विचार करत राहिलो की नक्की खरे काय? ...

.... नंतर अकराव्या दिवशी ते, - ज्यांचे नाव पुढे, “मी दिलीप आठवले” म्हणून त्यांनी सांगितले - आणखी एक वयस्कर साधक अन मी, एकाच ट्रेनमधून समोरासमोर बसून गप्पा मारत होतो. त्या वेळी त्यांनी आम्हाला पुन्हा सविस्तर सांगायला सुरुवात केली, ते दिलीप आठवले म्हणाले, “सर, पहाटेच्या वेळी काढलेला आवाज बोक्यांचा आवाज होता असे तुम्ही ज्याला म्हणालात, तो बोक्यांचा आवाज नव्हता! तो त्याच साधकाचा - माणसाचा - होता! अहो काय सांगू! मी शिबिरात उशिरा दाखल झालो. तोवर मौनाला सुरुवात झाली होती. मला फक्त किल्ली, पांघरुणे व खोली क्रमांक सांगितला गेला. मीही गुपचूप गेले दहा दिवस काढले. पण अहो, सुरुवातीला माझी अशी काही बोबडी वळली की काही विचारू नका! रात्रीच्या वेळी आसपासच्या जंगलातील विविध प्राण्यांच्या कळपांच्या आवाजांनी मनात धडधड व्हायची! अहो, अगदी त्या निरुपद्रवी मोरांच्या केकाटणाऱ्या आवाजाने भीती वाटायची राव! अहो, पहिले काही दिवस मी या शिबिरात कुठून आलो, असे कोसत होतो. नेमके मलाच का या माणसाशेजारी राहायला दिले गेले? त्यातही ही इमारत शेवटची! त्यात माझी खोली शेवटची! नंतर कुंपणापल्याड सर्व जंगल!

त्यात काही डाव होता की काय? त्यात सोबतीला दिला गेलेला असा साधक! चोर दरोडेखोरांनादेखील शिबिरातून साधना करायला देतात, म्हणून ऐकलं होतं. बहुतेक अशाच कोणा एकाला या कोपऱ्यातल्या खोलीत ठेवलेले असावे असा माझा पक्का संशय झाला होता! त्यांचे नाव मला काल कळले. ते होते शिरोटे म्हणून! पहिल्या रात्री झोपल्यावर ते असे काही आवाज काढायला लागले! मला आधी कळेना की, कोण

आवाज काढतंय ते! पलीकडून आपणच ते काढताय की काय असे मला कधीकधी वाटले! बरं, सांगायची सोय नाही! मौनाचा खाक्या! धम्मसेवकांना सांगावे काय, असे वाटून दोन दिवस तग धरली. ते काय आवाज काढतायत ते कळत नसे, पण ते ओरडून काही बोलत असावेत! मग पुढे मला हळूहळू लक्षात आले की हा 'उखने उठणे' म्हणजे झोपेत बोलणारे व कधी चालणारे म्हणून जो प्रकार असतो, तसा यांचा प्रकार आहे. आमच्या गावाकडं आमचं एक पावणं असेच गाव चाव्‌डीवर जे काही दिवसा घडे, ते रात्री झोपेत मोठ्याने बडबडत असत. तुम्ही असे का करता आम्हाला भ्या वाटतं, म्हणून त्यासनी सांगितलं तर त्यांचा विश्वास बसत नसं. “भ्या कुठं आसं करतोय?” ते म्हणत. तसाच यांचा प्रकार असावा, असे मला लक्षात आले. एकदा हे आमचे पावनं लग्नाला म्हणून मुंबईला गेले. परतताना रात्री टेंपोच्या ड्रायवरनी म्हटलं, “आता रातचं दोन वाजल्यात. मला इवाप येतिया. वाईच झोपतो मग जाऊ पहाटेच्या येळला गावाकड. त्या तासाभरात आमच्या पावन्याला उखनं उठलं अन् ते झालं गायब. बिना परवान्याचा चालक पहाट व्हायला लागली तसा वऱ्हाडाला घेऊन सोलापूरला परतला. घरची दोन लोक नंतर तीन दिवसांनी पावऩ्यांना पकडून यश्टींने घेऊन आले. अशीच तऱ्हा त्यांची.

मग मी जरा सरावलो. पण तुम्ही ज्या दिवशी बॅटरी घेऊन आलात, तेव्हा मात्र कहर झाला! फारच जोरात ते ओरडले होते! जे आवाज तुम्ही ऐकलेत तो मीही ऐकले! डोक्यावर पांघरूण घेऊन, डोळे किलकिले करून मी ते पाहत होतो! तुम्ही आल्यागेल्याचे, बोलल्याचे मी ऐकत होतो. नंतर तुम्ही बोक्याचे ते आवाज होते म्हणून त्यांना सांगितल्यावर ते बरं बरं म्हणाले, तेही मी ऐकले. पण तो खरा प्रकार असा होता!

विपश्यना शिबिरातील भुताटकीवरील तुमचा किस्सा एका लेखातून सुनवेन, असे मित्र दिलीप आठवल्यांना पुण्यात स्टेशनवर निरोप घेताना म्हटले होते. ते आज या अंकातून साकार झाले.

“पण सर, तो शिबिरातील आत्महत्या करायला जाणाऱ्याचा किस्सा सांगायचा राहिलाय बरं का”

असे त्यांनी हात हालवत नजरेआड व्हायच्या आधी म्हटले. मी म्हणालो, “वो किस्सा फिर कहीं, फिर कभी.”

भाग 3 समाप्त



भगवान बुद्ध कमलासनावर ध्यानस्थ मुद्रेत

**....'मी आत्महत्या करायला निघालोय. ... गेले काही महिन्यापासून अशा विमनस्क अवस्थेत मी आहे की आज जीव द्यावा की उद्या, गळफास लाऊन घ्यावा की लोहमार्गावर उडी घ्यावी इतकाच निर्णय उरलाय'. मी त्यांना न्याहाळत होतो. ते मजेत मुळीच बोलत नव्हते....**
**...तू जर हे यंत्र स्वतःसाठी पैसे मिळवायचे साधन म्हणून न मानता मानवतेच्या कल्याणासाठी तयार केले आहे असे म्हणतोस तर मग त्या यंत्रासाठी तुला आपला बळी द्यायचा अधिकार नाही....**

## 'मी आत्महत्या करायला निघालोय.

विपश्यना केंद्रातील विविध घटनांत अनेकांच्या अनुभवाची भर तेंव्हा पडली, जेंव्हा साधकांना शिबिराच्या शेवटच्या म्हणजे दहाव्या दिवशी साधकांना बोलायला परवानगी देण्यात आली. एकेकांनी नावे व कर्तृत्व सांगायला सुरवात केली. काही

जण गेली 20 वर्षे साधना करत होते. तर एकांची ही तिसाव्वीखेप होती. असे सांगताच आमच्यासारख्यां नवोदितांची छाती दडपली. पाच पेक्षा जास्त वेळा वर्णी लावलेले अनेक होते. पुण्याहून सारा नामक आलेल्या तरुणीची कमाल होती. ती जराही हालचाल न करता दोन दोन तास ध्यानात रंगलेली दिसे. मृदु हालचाली, खाली मान. मुद्दाम ओळख करून घेऊन मी माहिती घेतली तेंव्हा कळले की या बाईंनी मजा म्हणून सुरवात केली व आता घरी देखील त्या रोज समरसून साधना करतात. वेळोवेळी शिबिरात येऊन पुन्हा नव्याने प्रेरित होतात. यावेळी तर त्यानी सारख्या खोकणाऱ्या आपल्या सासूला बरोबर आणले होते.
रात्रीच्या पुज्य सत्यनारायण गोएंकांच्या प्रवचनात विषय होता - आता घरी गेलात की विचारणा सुरू होतील. काय कसे वाटले शिबिर? आमची आठवण येत होती का? कितपत झेपले?, काही अध्यात्मिक प्रगती झाली का? आदी... अशा प्रश्नांना कशी काय उत्तरे द्यायची याची गुरूकिल्लीही त्यांनी त्यात सांगितली. असो.
जीवन दुःखी व क्षणभंगुर आहे, राग-द्वेष एकाच नाण्याच्या दोन बाजू, पाप-पुण्य म्हणजे काय? मुक्ती का हवी? जन्ममरणाचा फेरा, कर्मगती आदि शाब्दिक आडंबर कळत आहे असे वाटत राहाते. पण त्याचा अनुभव नसल्याने ती फक्त पोपटपंची होते. तेच प्रत्यक्षात आपल्या शरीराच्या माध्यमातून अनुभवले, जाणवले जाऊ शकते. भगवान गौतम बुद्धांनी विपश्यना (विशेषत्वाने आपल्या शरीरावरील संवेदनांना जाणत वा पहात राहाणे) ध्यान पद्धतीचा विकास करून सामान्यांना ही कला अवगत करता येते असे प्रत्यक्षात करून व करवून घेऊन दर्शवून दिले. आता पुढील मार्गातील प्रगती करणे आपल्या हाती.
ते म्हणाले, ‘शिबिरात साधना व प्रज्ञा यांचे पालन व प्रत्यक्ष ज्ञान प्राप्त करायची कला साधली. शीलाचा - भंग न व्हावा म्हणून – मौन, एकांत वास, भिक्षा पात्रातून म्हणून अन्न सेवन आदी प्राचीन परंपरेतील काही गोष्टींतून स्वतःच्या शरीराला अशा प्रकारच्या साधनेला तयार करायला पुरक वातावरण व मानसिक बळ मिळवणे आदि गोष्टी घडल्या असे आपण सांगू शकाल’.
घरातील काही लोक थटटा करतील, मित्रमंडळींना चेष्टेचा विषय मिळेल. काहींना धर्म बदलायसाठीची मखलाशी असे वाटेल. त्याकडे लक्ष दिले नाही तर त्यातून सुटका होते. असो.
साधकांना बोलायला परवानगी मिळाल्यावर, पुज्य गोएंकांच्या सुत्रबद्ध पद्धतीने रात्रीच्या कथनातून मानसिक बळ कसे मिळाले. काही साधकांनी कधी कधी श्वासावर थोडावेळ नियंत्रण करता आले तर आपल्याला फाजिल आत्मविश्वास कसा

दगा देतो आदीची मजेशीर उदाहरणे सांगण्याला ऊत आला. अनुभव सांगायला मी इतरांना बोलते केले. प्रत्येकाला काय सांगू व काय नाही असे झाले व माझ्याभोवती गप्पांचा अड्डा जमला. रात्र जास्त झाली. पहाटे ४ वाजता (शेवटचे) उठायच्या धाकाने काही पांगले. त्या वेळी एकांनी मला जरा बाजूला नेले व म्हणाले, ‘का कुणास ठाऊक मला तुमच्याशी बोलावेसे वाटतेय म्हणून आपल्याला मी इकडे आणले’.
अंधारी वेळ, अंधुक प्रकाशात मी त्याला पहात म्हटले, ‘हो जरूर बोला’.
ते हलक्या आवाजात सांगायला लागले...... मी लिपारे....
‘मी आत्महत्या करायला निघालोय. काही अर्थिक अडचणी इतक्या हाताबाहेरच्या थराला गेल्यात की आता मला यातून सुटका होणे शक्य नाही असे वाटते. गेले काही महिन्यापासून अशा विमनस्क अवस्थेत मी आहे की आज जीव द्यावा की उद्या, गळफास लाऊन घ्यावा की लोहमार्गावर उडी घ्यावी इतकाच निर्णय उरलाय’. मी त्यांना न्याहाळत होतो. ते मजेत मुळीच बोलत नव्हते.
घरच्यांची आपल्या पश्चात काय दैना होईल, ते नाहक वाताहतीचे जीवन जगायला ढकलले जातील. त्यांचा काय अपराध असे वाटून मी कोणाशी ही मनातील न बोलता कुढत दिवस काढतोय. मी हे आपल्याला का सांगतोय ते मला माहित नाही. तरीही आपल्याशी बोलावेसे वाटले.
मला त्यांच्या मनाचा अंदाज येईना. दहा दिवसाच्या विपश्यने नंतर या ग्रहस्थांच्या दुःखाच्या संवेदना इतक्या तीव्र का असाव्यात, त्याला अजून मनाला सांभाळता येऊ नयेत या मागे नक्कीच काहीतरी जबरदस्त कारण असले पाहिजे असे मी मनात म्हणत त्यांच्या व्यक्तिमत्वाचा शोध घेण्याचा प्रयत्न करत होतो.
‘असे काय घडले की इतकी अटीतटीची वेळ यावी आपल्यावर? मी विचारुन कोंडी तोडायचा प्रश्न केला.
‘लाखो रुपयांचे कर्ज डोक्यावर असणे त्रासदायक नाही. पण ते फेडायचे सर्व मार्ग खुटलेत. मित्रांनी, नातलगांनी शक्य तेवढी मदत केली. काही भार कमी झाला. पण त्या रकमेवरील व्याज लाखोच्या घरात गेले आहे’. त्यांनी मनाचा एक कवडसा उघडला.
‘बर मी फाटका म्हणावा तसाही नाही. शिवाय मला अशी कला व तंत्रज्ञान माहित आहे की त्यावर मी करोडो रुपये निर्माण करू शकतो. पण ही सध्याची वेळ निभावणे मला असह्य झाले आहे’.
आपण मग शिबिराला कसे काय आलात?
त्यावर ते म्हणाले, ‘शिबिराबद्दल मी ऐकून होतो की साधनेमुळे काहींच्या मनस्थितीत

फरक पडतो. जगाकडे पहायच्या दृष्टीत बदल होतो, असे ही मी वाचले होते. जायच्या आधी निदान हा प्रयत्न तर करू असे वाटून मी इथे आलो. पण मौन वगैरेमुळे सुरवातीला मनातील कोंडमारा वाढायला लागला. साधनेच्या काळात आधार वाटला की यातून मार्ग निघेल. पण उद्या इथून जायची वेळ आली तरी ही पाय मागे घेण्याचा निश्चय होत नाही’.

मी आपली काय मदत करू शकतो? असे हलक्या आवाजात विचारून मनाचा थांग लागतोय का ते पहात मी म्हटले. तेवढ्यात कोणी जवळ आल्यासारखे झाले व त्या ग्रहस्थांनी माझा हात हातात घेऊन पुन्हा जरा बाजूला नेले. ‘काय आहे की मी एक कल्पक उद्योजक आहे. मी असे एक यंत्र निर्माण केले आहे कि ज्यामुळे काही क्रांतिकारी लाभ संपुर्ण भारताला नव्हे जगाला होतील. त्यासाठी मी अत्यंत खबरदारीपुर्वक आयोजन करून अत्यंत गुप्त रीतीने त्याच्या चाचण्याघेऊन त्या यशस्वी केल्या’.

आपण त्याचे पेटंट मिळवायची सोय केली आहेत ना? असे मी विचारता ते म्हणाले, ‘हो ती मला सर्व माहिती आहे. पेटंट मिळवायला लागणारी खटपटी करून तयारी झाली. पण त्याला **लागणारा लाखोंचा खर्च मला सध्या आवाक्या बाहेरचा आहे. त्यांनी मला थोडक्यात त्या यंत्राबाबत सांगायला सुरवात केली. जरा कल्पना आली तशी त्यावर मी त्यांना अडवून म्हटले, ‘आपण मला त्याबाबत काहीही सांगू नये. कारण ते ज्ञान आपले आहे. ते आपल्यापाशीच सुरक्षित राहावे’.**

**‘खरे आहे’ असे म्हणून त्यांनी सांगणे आवरते घेतले.**

**‘जर तुम्ही आत्मघाताचा निर्णय घेतलेला असेल तर कोणीही आपल्याला परावृत्त करू शकणार नाही’. मी माझे मन मोकळे केले. मात्र एकदम सांगावेसे वाटले ते सांगतो. आपण त्या यंत्राच्या कार्यप्रणालीबाबत एक फाईल तयार करा. त्यात ते यंत्र कसे चालते, त्याच्या तांत्रिक बाजू काय आहेत, त्यातील महत्वाची कामे करणारी केंद्रे कोणती यांचा सर्वच्या सर्व बारीकसारीक तपशील लिहून काढा. फोटो काढा. शक्य असेल तर व्हीडिओ शूटिंग करा. तेही अगदी सीक्रेट पद्धतीने’.**

**‘असे काही मी अजून केलेले नाही. पण आपली कल्पना अमलात आणायसारखी आहे’. ते म्हणाले.**

**‘धन्यवाद असे सांगितल्याबद्दल’. माझा हात हातात घेत मग ते म्हणाले, ‘का कोणास ठाऊक मला शिबिरात आल्यावर असे सारखे वाटत होते की कोणी एकजण मला असे भेटतील का की त्यामुळे मला इथे आल्याचे समाधान राहील’.**

**मी मनात म्हटले की याला त्याच्या भीषण अडचणीत अर्थिक मदत करणे**

माझ्याकरिता शक्य नाही. मग काय बरे करता येईल कि त्यामुळे त्याचे मन वळेल? तोंडातून आपसुक शब्द निघाले, ‘मित्रा, तू आत्मनाश करावास याचे वाईट वाटते. घरचे तुझ्या पश्चात मरणार नाहीत. जिकिरीचे जीवन जगून आपापले मार्ग शोधतील. काही काळाने तुला विसरतील. पण एक गोष्ट तुला कधीच माफ करणार नाही. ती म्हणजे तू बनवलेले यंत्र. ती तुझी निर्मिती आहे. त्याला टाकून तू असा गेलास तर त्याला पोरके केल्याचे पाप तुला लागेल. तू जर हे यंत्र स्वतःसाठी पैसे मिळवायचे साधन म्हणून न मानता मानवतेच्या कल्याणासाठी तयार केले आहे असे म्हणतोस तर मग त्या यंत्रासाठी तुला आपला बळी द्यायचा अधिकार नाही....

त्याची हातावरील पकड अधिक घट्ट झाली. ‘खर आहे, खर आहे’. असे तो पुटपुटला. मी त्याच्या खांद्याला हळुवार स्पर्श करून थोपटले... चलतो म्हणून बाजूला झालो....

.....पहाटे निरव शांततेत घंटेच्या टोल्यांनी आपले मौन सोडले. आणि दहा दिवसांच्या या मौनयात्रेतील आठवणींचे गाठोडे उराशी धरून धम्मशालेच्या परिसरातून निघायला सामानाची बांधाबांध सुरू झाली. नव्या उत्साहाने, जोमाने. शरीर व मनाच्या निष्चयाने. आता मला जनसेवा अधिक जोमाने करायची आहे......

## अंतिम भाग ५ पुढे चालू

# विपश्यना ध्यान शिबिर
# धम्मालय, कोल्हापूर
## भाग ९

# विपश्यना साधकवीर परतले !

**भाग ५**

दुपारची वेळ. 'मी गाडीत आहे. साधारण ४ला घरी पोहोचेन' म्हणून पत्नीच्या सेल फोनवर साहेबांचा निरोप आला आणि घरच्यांची लगबग सुरु झाली. गेले १२ दिवस घरी मरगळून पडलेला सेल फोन आता मालक कामाला लावणार असे वाटून चार्जिंगला चढला. कारण ही तसे जबरदस्त होते. बरेच दिवस गाजत असलेले विपश्यना केंद्राचे काम पेंडिंग होते, ते करून साहेब परतणार होते. मुले मुद्दाम सुट्टी काढून घरी वाट पहायला आली होती. मुलगी 'डॅड कसा दिसतोय? हाडकला कि काय' पाहायला मुद्दाम आली होती तर मुलाला 'बाबांच्यात काय फरक पडलाय?' ते जाणून घ्यायला उत्सुकता होती. पत्नी 'आता काय काय करतायत' याची धास्ती वाटून जरा सावध पवित्र्यात होती. आईला 'फार काही काही करतो बुवा हा मुलगा लहानपणापासून' असे वाटून चिरंजीवाबद्दल हुरहुर वाटत होती.
'टिंगटाँग' दरवाज्यावरील बेल दोनदा वाजली अन दरवाजा हळूच उघडला. हातात आरतीचे ताट, निरांजन, कुंक व अक्षतांच्या वाट्या... जय्यत तयारी होती.....
मुलीकडून कपाळाला कुंकवाचा टिळा लागला, ओवाळून घेता घेता साहेबांना वाटले की आता गळ्यात हार नक्की पडणार बर का! पण कुठलं काय!
"हाय, डॅड ग्रेट....व्हॉट ए ग्रँड गोल्डन औरा अराउंड यू!!..... च्यक च्यक करता तिने साहेबांना धक्का दिला. "आई, पहा पहा, बाबांच्या मागे केवढं मोठं सोनेरी प्रकाश वलय आलयं ते" चिरंजिवांनी पुकारा केला....
साहेब चमकले. खरच कि काय! वाटलं, न जाणो असे काही आहे कि काय! असे वाटून त्यांनी पत्नीकडे प्रश्नार्थक पाहिले, तेंव्हा पोरं आपली फिरकी घेतायत असा

तिचा चेहरा पाहून ते वरमले.
साहेब दारातून आत आले. कोचावर विसावले. पाण्याची तहान लागली होती. आता ग्लासातून सरबत नक्की येईल असा विचार मनात डोकावला पण ते तडक उठून फ्रिजमधून गार पाणी गटागटा पिऊ लागले. फार घाई यांना सगळ्याची असा मनात विचार करत पत्नीने त्वरेने म्हटले, “अहो थांबा, चहा टाकलाय सगळ्यांसाठी”…
पदार्थांची प्लेट हातात घेत साहेबांनी तोंड उघडले. म्हणाले, “ग्रेट! आऊट ऑफ धिस वर्ल्ड एक्सपिरियन्स!…. वन मस्ट गेट इट!!….
काही घास घेऊन ठेवलेली प्लेट पाहून आईने आणखी घालायसाठी आग्रह केला. तर साहेब उठले. तडक बेसिनपाशी जाऊन आपली प्लेट-चमचा विसळून जागेवर ठेवत म्हणाले, ‘दहा दिवसात लागलेली सवय आता कंटिन्यू ठेवली पाहिजे’ …
‘भलतच काही तरी फॅड आहे झालं’ मुलीने विचार केला. चिरंजीवांनी कौतुकाने मान हलवली. तर आईला विचित्र वाटले असे मोलकरणी सारखे वागणे. साहेबांनी तोंड उघडले की ‘भोक्ता भाव, शरीरावरील संवेदना, समता व अनिच्छ भाव’ आदि कल्पनाविस्तार ऐकून इतरांना हे मौनात बरे असे काही मिनिटात वाटू लागले! पांगापांग झाली. रात्रीचे जेवण साहेबांनी संध्याकाळच्या प्लेटमधील पदार्थांवर झाल्याचे पुकारल्याने चिकन मसाला करी व तळलेले फिश फ्रिजमधे सरकले. रात्री ११ च्या बातम्या घेतल्याशिवाय न झोपणारे साहेब, मेल न्याहाळून कॉम्प बंद करून बेडरुमकडे वळले. अल्प वस्त्रात पत्नी वाट पहात आहे असे त्यांनी खालच्या मानेने पाहिले. तिच्या बेडरुमचा लाईट मालवला. ते दुसऱ्या बेडरूमकडे वळले. मनात म्हणत होते, “आता भोक्ता भाव नाही! फक्त द्रष्टा भाव! …. एक चटोर मासिक हातात घेत त्यांनी बेडरुमचा लाईट लावला….

## भाग ५ संपूर्ण समाप्त…..